शेगांव तीर्थक्षेत्र विकास आराखड्यातील
कामासाठी निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/भाग-१/का.१४४४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०१ मार्च, २०१७

**वाचा :-**

१.शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२००९/प्र.क्र.८०/का.१४४४, दि. ८ मार्च, २०१०
२.शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२००९/प्र.क्र.८०/का.१४४४, दि. ५ मे, २०११
३. शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४, दि. १८ जानेवारी, २०१६
४. शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४, दि. २७ जानेवारी, २०१६
५. शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४, दि. २ मे, २०१६
६.विभागीय आयुक्त, अमरावती, यांचे पत्र क्र. आकाअ/शेतीविआ/२०१६-१७/ मासिक/ निधीवित/२८५/२०१६, दि.८ नोव्हेंबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

श्री. गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगांव येथे तीर्थक्षेत्री मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी उक्त शासन निर्णय दिनांक ८ मार्च, २०१०, दिनांक ५ मे, २०११ व दिनांक १८ जानेवारी, २०१६ अन्वये मान्यता देण्यात आलेल्या आराखड्यातील ₹३६७.०० कोटी शासन सहभागाच्या कामांसाठी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी विभागीय आयुक्त, अमरावती यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री. गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगांव येथे तीर्थक्षेत्री मूलभूत सुविधा निर्माण करण्याच्या आराखड्यातील कामांसाठी विभागीय आयुक्त, अमरावती यांना ₹३६०.०० हजार निधी वितरित करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप पुढीलप्रमाणे आहे.:-

| उद्दिष्ट | | (रुपये हजारात) |
|---|---|---|
| ०१, वेतन | -- | ३६०.०० |
| | **एकूण** | **३६०.००** |

२. सदरहू खर्च लेखाशिर्ष "मागणी क्र.ओ-८, मुख्य लेखाशिर्ष ३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनसाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००) (०३) श्री गजानन महाराज शेगांव, तीर्थक्षेत्र विकास विशेष कृती कार्यक्रम (३४५२ २७३१) योजनातंर्गत (दत्तमत)" याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ८ फेब्रुवारी, २०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०११६५७१६४५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Prashant Sarjerao Hadambar
Date: 2017.03.01 16:58:38 +05'30'

**( प्रशांत हाडंबर )**
कार्यासन अधिकारी.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, अमरावती .
४) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, बुलढाणा.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती / बुलढाणा.
७) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.

-----------